**राज्यातील सहकारी संस्थांच्या थकीत कर्जासाठी एकरकमी कर्ज परतफेड योजना तयार करण्यासाठी अभ्यासगटाची स्थापना करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण ०३२२/ प्र.क्र.१५७/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ मार्च, २०२२

**प्रस्तावना :-**

राज्यातील सहकारी साखर कारखाने, सहकारी सुतगिरण्या तसेच इतर सहकारी संस्था व अन्य कर्जदारांना महाराष्ट्र राज्य सहकारी बँक तसेच जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांमार्फत मुदत कर्जे देण्यात येतात. सहकारी बँकांनी संस्थांना दिलेल्या मुदत कर्जाची नियत वेळेत परतफेड करणे अपेक्षीत आहे. तथापी सद्यस्थितीत बँकांकडून विविध सहकारी संस्था व अन्य कर्जदारांनी घेतलेल्या कर्जाच्या थकबाकीचे प्रमाणे वाढले असल्याने दिसून येत आहे.

सदर थकबाकीदार सहकारी संस्था तसेच अन्य कर्जदार हे महाराष्ट्र राज्य सहकारी बँक तसेच जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना कर्जाची परतफेड करु शकत नसल्याने त्यांना नवीन कर्ज उपलब्ध होऊ शकत नाही. त्यामुळे सहकारी संस्था व अन्य कर्जदारांना खेळते भांडवल उपलब्ध होऊ शकत नाही. या सर्व बाबींचा विचार करुन महाराष्ट्र राज्य सहकारी बँक तसेच जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांकडून कर्ज घेतलेल्या सहकारी संस्था व अन्य कर्जदारांसाठी सर्वकष अशी एकरकमी कर्ज परतफेड योजना तयार करण्यासाठी अभ्यासगटाची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त पार्श्वभूमीवर महाराष्ट्र राज्य सहकारी बँक व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांच्या थकीत कर्जाच्या वसूलीसाठी सर्वकष अशी एकरकमी परतफेड योजना तयार करण्यासाठी खालीलप्रमाणे अभ्यासगट गठीत करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १ | सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे. | अध्यक्ष |
| २ | साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे | सहअध्यक्ष |
| ३ | पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ४ | प्रशासक/कार्यकारी संचालक, दि महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई | सदस्य |
| ५ | मुख्य कार्यकारी अधिकारी सांगली जि.म.स. बँक, सांगली. | सदस्य |
| ६ | अपर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था,सहकार आयुक्तालय, पुणे | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :-**

१) रिझर्व्ह बँक तसेच नाबार्ड यांचेद्वारे वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या परिपत्रकांचा अभ्यास करुन राज्यातील सहकारी संस्थां व अन्य कर्जदारांसाठी सर्वकष अशी एकरकमी कर्ज परतफेड योजनेचा मसूदा तयार करणे.

२) सदरहू समितीने आपला अहवाल एक महिन्यात शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३१७१०५८०९१८०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Shrikrushna Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2022.03.17 11:00:34 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**
विशेष कार्य अधिकारी तथा सहनिबंधक,
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मंत्री, वित्त व सहकार यांचे खाजगी सचिव
३) मा. विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य (सर्व)
४) मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव
५) मा. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
७) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) अपर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था,सहकार आयुक्तालय, पुणे
१०) मुख्य महाप्रबंधक, भारतीय रिझर्व्ह बँक, केंद्रीय कार्यालय, मुंबई
११) मुख्य महाप्रबंधक, नाबार्ड प्रादेशिक कार्यालय, पुणे
१२) चेअरमन, राज्य स्तरीय बँकर्स समिती , बँक ऑफ महाराष्ट्र,पुणे.
१३) विभागीय आयुक्त, (सर्व)
१४) जिल्हाधिकारी (सर्व)
१५) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
१६) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१७) जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१८) प्रशासक/कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई
१९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक (सर्व)
२०) निवडनस्ती.